कंत्राटी तत्वावरील चौकशी अधिका-यांची नियुक्ती
गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांविरुध्दची प्रकरणे

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांक : विचौअ-१६२१/प्र.क्र.५०/विचौ-२ (११-अ)**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक:- ०९ जुलै,२०२४

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, क्र.एसपीओ-२८०४/प्र.क्र.११/२००४/११-अ,दि.२६.०५.२००६
२) शासन निर्णय, क्र. विचौअ १६१८/प्र.क्र.१२/११-अ, दि.२१.०५.२०१८
३) शासन परिपत्रक, क्र.विभाचौ १६२१/प्र.क्र.२६/११-अ, दि.२०.०६.२०२२
४) शासन आदेश, क्र.विचौअ १६२१/प्र.क्र.५०/११-अ, दि.०१.१२.२०२२

**आदेश-**

राज्यातील गट-अ आणि गट-ब मधील अधिकाऱ्यांची तसेच गट-क आणि गट-ड मधील कर्मचाऱ्यांची विभागीय चौकशीची प्रकरणे तातडीने व सातत्याने निकाली निघावीत यासाठी शासन सेवेतून निवृत्त झालेल्या इच्छुक व पात्र अधिकाऱ्यांची कंत्राटी तत्त्वावर “चौकशी अधिकारी” म्हणून नियुक्ती करण्याचा निर्णय संदर्भाधीन क्र.१ व क्र. २ येथील शासन निर्णयांन्वये घेण्यात आला आहे. या अनुषंगाने कंत्राटी तत्वावरील चौकशी अधिकाऱ्यांची अद्ययावत यादी संदर्भाधीन क्र.३ येथील शासन परिपत्रकांन्वये निर्गमित करण्यात आली असून त्यानंतर संदर्भ क्र.४ येथील आदेशान्वये २ चौकशी अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

२. आता वर नमूद आदेशांतील संबंधित अटी व शर्तींच्या अधीन राहून, गट-अ (सातव्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर एस-२५:७८८००-२०९२०० पेक्षा खालील वेतनस्तर/असुधारित वेतन संरचनेमधील रु.७६०० पेक्षा कमी ग्रेड वेतन) आणि गट-ब मधील राजपत्रित अधिकाऱ्यांच्या विभागीय चौकशा करण्यासाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील सेवानिवृत्त अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

३. नागपूर व अमरावती विभागांमध्ये यापुढे नव्याने उद्भवणाऱ्या शिस्तभंगविषयक प्रकरणांत चौकशी अधिकाऱ्यांची नियुक्ती करताना शिस्तभंगविषक प्राधिकाऱ्यांनी अशी प्रकरणे प्राधान्याने कंत्राटी तत्वावरील चौकशी अधिकाऱ्यांकडे सोपवावीत.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०९११४०१२४१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT SAJANIKAR
Digitally signed by PRASHANT SAJANIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=471c7cbe63d119adc5855a3c23ed95de986c1c7bc41d6f6cdd3767b3ebe74c82,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=217003E42C820EC29C89162937F98929453CC6295B34F71EA285041053A66AA7,
cn=PRASHANT SAJANIKAR
Date: 2024.07.09 11:51:11 +05'30'

**( प्रशांत साजणीकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र- विवरणपत्र**

**प्रति,**

१. श्री. गोपाळ गंगाराम निगुडकर, २०३ कालिका टॉवर, कोलबाड रोड, खोपट, ठाणे (पश्चिम) ४००६०१.

२. श्री. संजय शरदचंद्र गोखले, एन-१/५०२, अमृतगंगा सहकारी गृनिर्माण संस्था,सिंहगड रोड, वडगाव (बु), पुणे-४११०४१

३. श्री.सुनिल राजाराम भोसले, प्लॅट नं.१४०१,ईडन पॅलेस, सेक्टर १६/A,सानपाडा, नवी मुंबई-४००७०३.

४. श्री. भटू संभू वानखेडे , प्लॉट नं. १०, पाण्याच्या टाकीजवळ, शांतीनगर समोर, वेलवली बदलापूर (प.), जि. ठाणे.

५. विभागीय आयुक्त, नागपूर/औरंगाबाद/अमरावती विभाग

६. सर्व जिल्हाधिकारी, नागपूर/औरंगाबाद/अमरावती

७. प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी,
कोकण/पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती.

८. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,

९. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व क्षेत्रिय कार्यालये (संबंधित विभागांमार्फत)

१०. कार्यासन विचौ-२ (संग्रहार्थ.)

**शासन आदेश क्रमांक :विचौअ-१६२१/प्र.क्र.५०/विचौ-२ (११-अ), दि. ०९ जुलै, २०२४ सोबतचे विवरणपत्र**

**कंत्राटी तत्वावरील चौकशी अधिकाऱ्यांची नियुक्ती**

**गट अ व गट ब ची यादी (पॅनल)**

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, पदनाम व पत्ता | मोबाईल क्रमांक व मेल आयडी | जन्मदिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | वयाची ७० वर्षे पूर्ण होण्याचा दिनांक | नियुक्तीचा महसूली विभाग |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | **श्री. गोपाळ गंगाराम निगुडकर**<br>अप्पर जिल्हाधिकारी, (सेवानिवृत्त)<br>२०३ कालिका टॉवर, कोलबाड रोड, खोपट, ठाणे (पश्चिम) ४००६०१ | मोबाईल क्र. -<br>९४२२४ २६०६६<br>९३२३१ २८८४४<br>gopal.nugudkar @ rediffmail.com | १४.१२.१९५७ | ३१.१२.२०१५ | १४.१२.२०२७ | नागपूर, औरंगाबाद अमरावती |
| २ | **श्री. संजय शरदचंद्र गोखले,**<br>सह सचिव (सेवानिवृत्त)<br>एन-१/५०२, अमृतगंगा सहकारी गृनिर्माण संस्था,सिंहगड रोड, वडगाव (बु), पुणे-४११०४१ | मोबाईल क्र.<br>९८२०१ २०१७८<br>gokhale.sanjay@ yahoo.com | ०९.१०.१९६१ | ३१.१०.२०१९ | ०९.१०.२०३१ | नागपूर, औरंगाबाद, |
| ३ | **श्री.सुनिल राजाराम भोसले,**<br>संचालक, संचालनालय स्थानिक निधी (सेवानिवृत्त)<br>प्लॅट नं.१४०१,ईडन पॅलेस, सेक्टर १६/A,सानपाडा, नवी मुंबई-४००७०३. | मोबाइल क्र. -<br>९९३०५ ३७०४६<br>sunilr.bhosale1962@ gmail.com | १२.०३.१९६२ | ३१.०३.२०२० | १२.०३.२०३२ | औरंगाबाद |
| ४ | **श्री. भटू संभू वानखेडे,**<br>सह सचिव (सेवानिवृत्त)<br>प्लॉट नं. १०, पाण्याच्या टाकीजवळ, शांतीनगर समोर, वेलवली बदलापूर (प.), जि. ठाणे. | मो.क्र. ९५११९ १०१४४<br>wankhedebs006 @gmail.com | ०६.१२.१९६४ | ३१.१२.२०२२ | ०६.१२.२०३४ | नागपूर, औरंगाबाद अमरावती |